

दुर्ग दुर्गट भारी

## पुस्तिका दुसरी

# किल्ले विकटगड

## पेबचा किल्ला

# || पुस्तक दुसरे ||

# || किल्ले  विकटगड  उर्फ़ पेबचा किल्ला ||

**प्रथमावृत्ती : २ जुलै २०११**

**संपादक : नचिकेत जोशी**



**ई साहित्य प्रतिष्ठान**
**जी ११०२, ईटर्निटी**
**मॅरेथॉन चौक**
**ठाणे . ४००६०४**

मांडणी व सजावट: सुनिल सामंत




दिव्यत्वासमोर माथा टेकू
पण
अत्याचारासमोर गुडघे टेकणार नाही

असा मराठी बाणा
जागता ठेवणारे

माथेरानच्या रानांआडून
ब्रिटिशांशी गनिमी युद्ध पुकारणारे

## हुतात्मा भाई कोतवाल
## यांना ही पुस्तिका समर्पित

# : अनुक्रम :



** आडवाटांचे देणे

नमस्कार दोस्तहो!!

रोजच्या धावपळीच्या आयुष्यातून निवांतपणा शोधत डोंगरदऱ्या पालथ्या घालायला सुरुवात करून तुम्हाला अनेक वर्षं झाली असतील. अस्सल ट्रेकरची वर्णने वाचून त्यानुसार स्वत:ला त्यात बसवण्याचा प्रयत्नही करून झाला असेल. मनात आलं की पाठीवर (कायम भरून तयार असलेली) सॅक टाकून भटकणं आता सवयीचं झालं असेल. सगळं जग क्रिकेट मॅच किंवा लग्नसमारंभ अशा मोहमयी गोष्टींत अडकले होते, किंवा थिएटरमधल्या उबदार खुर्च्यांवर बसून थंडगार वातावरणात, अगदी जवळ बसून (कुणाच्या हा प्रश्न तुम्हाला पडला नसणार याची आम्हाला खात्री आहे) वेळ घालवत होते, तेव्हा आपण स्वत: मात्र काय केलं होतं ते आठवतंय ना?

उजाडण्याची वाट बघत रेल्वे प्लॅटफ़ॉर्मवर रात्र काढली होती, वाटेतल्या एखाद्या दगडावरच पाठ टेकवली होतो, सूर्योदय-सूर्यास्ताचे फोटो घ्यायला छाती फुटेपर्यंत कड्याच्या दिशेने धावला होतो, बाहेर पडणाऱ्या पावसाच्या आणि रातकिड्यांच्या किरकिऱ्या म्युझिकच्या साथीने गुहेत ट्रेकी गाण्यांची मैफल भरवली होती. अंधारात, पाऊस तोंडावर झेलत राजांचे मावळे असल्यागत नदी-नाले-चिखलगाळ तुडवला होता (आणि मुक्कामाला पोहोचलो तेव्हा पायातून बूट शेवटी ओढून काढावे लागले होते!)."घरी आराम करायचं सोडून इथे मरायला यायला कुणी सांगितलं होतं" हा प्रश्न जेव्हा जेव्हा पडला होता तेव्हा पुढच्याच वळणावर एखाद्या झऱ्याने, एखाद्या बुलबुल-ससाण्याच्या शर्यतीने, एखाद्या नाजूक फुलाने किंवा आकाशातल्या नक्षत्रांच्या सड्याने त्याचं

उत्तर परस्पर देऊन टाकलं होतं.(पुढे पुढे मात्र हा प्रश्न कधी पडलाच नाही!) कुठल्याही ट्रेकमध्ये मिसळ-पाव खाल्ला नाही आणि एकदा तरी निसर्गाच्या सान्निध्यात "दान" केलं नाही तर ट्रेक निष्फळ ठरतो, तसेच ट्रेकमध्ये नैसर्गिक पाणीसाठे सोडून इतरत्र आंघोळ करणे हे पाप असते या विचारांवर निष्ठा ठेऊन राजांच्या जयघोषात कधी तोरणा-राजगड, तर कधी रतनगड-हरिश्चंद्रगड, कधी पन्हाळगड-विशाळगड तर कधी खांडस-भीमाशंकर अशा वाऱ्या केल्या होत्या! (आणि फावल्या वेळात ट्रेकिंगने आम्हाला काय दिलं, किंवा मी ट्रेक का करतो अशा चर्चांमध्येही सहभागी झालो होतो!)

शहरातल्या रंगीबेरंगी दुनियेपेक्षा सह्याद्रीच्या सहवासातली रंगाची दुनिया अधिक मोहक आणि अस्सल आहे हे आपण केव्हाच स्वत:शी कबूल केलं आहे! आणि म्हणूनच एखादा चित्रपट पुन्हा पुन्हा बघावा तसं दर उन्हाळा-पावसाळा-हिवाळयात त्याच ओढीने आजही तेच किल्ले, तेच उतार, तेच बुरूज, तेच दरवाजे, त्याच कातळ-कपारी, त्याच अवघड पायवाटा आपण तुडवत असतो. अर्थात "सर्व प्रकारचे विरोध" (सूज्ञांस अधिक सांगणे नलगे!) मोडून काढून हे करावं लागतं हे खरंच! पण "हे कार्य" व्हावे ही तो श्रींचीच इच्छा!! कदाचित या ट्रेकिंगमुळेच आपण दैनंदिन जीवनातसुद्धा ट्रेकरच्या खाक्यानेच वागतो. कचरा इकडे-तिकडे टाकत नाही, पाणी जपून वापरतो, खिशात सदैव एक टॉर्च घेऊन फिरतो, कशाशीही काहीही तोंडी लावून खाऊ शकतो, कुठेही adjust करू शकतो, इतर पर्यटनस्थळांच्या ठिकाणी चाललेला थिल्लरपणा पाहून आपलं रक्त खवळतं इ. इ.

"दुर्ग दुर्गट भारी" या नव्या ई-पुस्तकांच्या मालिकेत आम्ही आपल्यासोबत करणार आहोत महाराष्ट्रातल्या परिचित-अपरिचित गडकोटांची ई-यात्रा! आपण नवखे असाल तर मार्गदर्शक म्हणून आम्ही आपल्या सोबत असू आणि अट्टल भटके असाल तर आपल्यासाठी ही जुन्या सदाबहार आठवणींची यात्रा असेल. एका पुस्तिकेत एक-दोन किल्ले, त्यांची ऐतिहासिक, भौगोलिक माहिती, वैशिष्ट्ये, प्रवासाचे तपशील इ सर्व माहितीने परिपूर्ण अशी ही मालिका असेल. दुर्गभ्रमंतीचं एक रेकनर म्हणूया हवंतर!

आपल्यासारख्या अट्टल भटक्यांच्या स्वागताला आडवाटाही सजवून सदैव तयार असणाऱ्या आपल्या लाडक्या सह्याद्रीमधल्या दुर्गभ्रमंतीला - चला, निघूया!

**नचिकेत जोशी**
**(संपादक, दुर्ग दुर्गट भारी)**



Flora seen during Trek to Vikatgad (Peb) near Matheran

# प्रस्तावना – पेब

नमस्ते दोस्तहो!

"दुर्ग दुर्गट भारी"च्या रायगडाबद्दल प्रकाशित झालेल्या पहिल्या अंकाला मिळालेल्या तुफान प्रतिसादांमध्ये न्हाऊन वगैरे निघालो असतानाच दुसरा अंक काढण्याची वेळही झाली. एकीकडे पहिल्या अंकाच्या आपण सर्वांनीच केलेल्या त्या भरभरून कौतुकाचं ओझं ट्रेकींगसॅक इतकंच जड, पण हवहवंसं वाटतंय, आणि दुसरीकडे पुढचा किल्लाही खुणावतोय.

यावेळी आपण जाणार आहोत, शिवछत्रपतींच्या जगप्रसिद्ध दुर्गरत्नांपेक्षा वेगळ्या, काहीशा अपरिचित, पण सोप्या अशा एका किल्ल्यावर – पेब उर्फ बिकटगड किंवा विकटगड. मुंबई आणि पुण्यापासून पासून अगदी २ तासांवर, एका दिवसात सहज फिरून होणारा असा हा किल्ला.

किल्ल्याचा इतिहास फारसा ज्ञात नाही. त्याचा शोध घेत आहोतच. पण शिवछत्रपतींच्या पदस्पर्शाने पावन झालेला किल्ला ही ओळखही काही कमी अभिमानास्पद नाही, नाही का?

तेव्हा निघूया, किल्ले पेबकडे!

**भौगोलिक स्थानः**

किल्ले पेब रायगड हा महाराष्ट्रातील रायगड जिल्ह्यातील खालापूर तालुक्यात नेरळ जवळ माथेरान डोंगराजवळ वसलेला आहे.
या किल्ल्याला विकटगड किंवा बिकटगड असेही नाव आहे.

अक्षांश– रेखांश – १९ ०१' ४०.४८'' उत्तर व ७३१६'३६.५३" पूर्व
उंची – समुद्रसपाटीपासून २१०० फूट
दुर्गप्रकार – डोंगरी किल्ला
श्रेणी – मध्यम

**शेजारी पाजारी –**

पूर्वेस – मुंबई–पुणे लोहमार्ग, पेठचा किल्ला
पश्चिमेस – गाढेश्वर तलाव, मलंगगड
दक्षिणेस – माथेरान
उत्तरेस – नाखिंद सुळका, चंदेरी
नैऋत्येस – प्रबळगड
आजूबाजूला – चंदेरी, मलंगगड, ईर्शाळगड, प्रबळगड, पेठचा किल्ला



gadheshwar lake

## जाण्याचे मार्ग –

जवळचे मोठे गाव – नेरळ

कर्जतहून, तसेच मुंबईहून मध्य रेल्वेच्या उपनगरी ट्रेन आहेत.

स्वत:चे वाहन असेल तर खोपोलीहून कर्जतमार्गे लोहमार्गाला बराचसा समांतर रस्ता आहे. नेरळहून घाट चढून माथेरान नगरपालिकेच्या वाहनतळावर **दस्तुरी येथे** गाडी लावता येते.






## इतिहास

पेबच्या किल्ल्याला बिकटगड असेही म्हणतात. नेरळ गावाजवळ पेबी नावाच्या देवीचे मंदिर आहे, त्यावरून गडाला पेब म्हणत असावेत असा एक अंदाज करता येईल.

गडाला फारसा ज्ञात इतिहास नाही. चिटणीस बखरीमध्ये या किल्ल्याचा उल्लेख सापडतो. शिवछत्रपतींच्या सिद्दी(हबशी)विरूद्धच्या मोहिमेत सहभागी होण्यासाठी सिद्दीच्या चाकरीमध्ये असणाऱ्या दोन मराठी अधिकाऱ्यांना पाठवलेल्या पत्रात महाराज म्हणतात, 'आपण सिद्दीवर हल्ला करावा, आम्ही आपणाला किल्ले घेण्यास मदत करू.' त्या प्रमाणे महाराजांनी कोकणात स्वारी करून तळा, घोसाळा व पेब हे किल्ले घेतले. पुरंदरच्या तहामध्ये महाराजांनी मिर्झाराजांना दिलेल्या २३ किल्ल्यांमध्ये बख्तगड असा एका किल्ल्याचा उल्लेख येतो. तो बख्तगड म्हणजेच बिकटगड (पेब) असण्याची शक्यता आहे.
त्यानंतरचा किल्ल्याबद्दलची ज्ञात असलेली घटना म्हणजे दि ११ ऑक्टोबर १७५३ रोजी पेशव्यांचे सरदार रामाजी महादेव यांनी मानोजी आंग्रे यांच्याकडून पेब जिंकून घेतला.

( वाचकांना विनंती : आपणांकडे जर या किल्ल्याच्या इतिहासाची काही साधार माहिती असेल तर कृपया कळवावी. पुढील आवृत्तीत आपल्या नावासह ती प्रकाशित केली जाईल)

**पेबचा फेरफटका –**

नाखिंद सुळक्याजवळून येणाऱ्या वाटेवर दोन गुहा लागतात. त्यांमध्ये अक्कलकोट स्वामी समर्थांच्या प्रतिमा भिंतीवर रंगवलेल्या आहेत. गुहांचे प्रवेशमार्ग अरूंद असले तरी गुहा प्रशस्त आहेत.

गडाच्या माथ्यालगतच्या भागात कातळामध्ये खोदलेले एक लेणे आहे. या लेण्यातील खोलीमध्ये सध्या एक साधू वस्तीला आहे. शिखराजवळच्या भागात एक आश्रम असून शिखरावर चौथरा आणी पादुका आहेत. इथून सभोवतालचा सुंदर नजारा दिसतो. किल्ल्याच्या उत्तरेकडील भागात खालच्या अंगाला एक शिवमंदिर आहे. त्याच्या समोर खोल दरी, आणि दरीपलीकडे उजव्या हाताला माथेरानचा पॅनोरमा पॉईंट दिसतो.



**पेबच्या ट्रेकर्ससाठी उपयुक्त माहिती –**



गडावर राहण्याची सोय – वास्तविक पेब हा एका दिवसाचा ट्रेक आहे. पण मुक्कामाची वेळ आलीच तर गडावरील गुहेमध्ये आसरा मिळू शकेल.

गडावरील खाण्याची सोय – नाही. तहानलाडू–भूकलाडू पाठीवरून न्यावे लागतात.

पाण्याची सोय – शिवमंदिराजवळ एक आणि गुहेजवळ एक अशी दोन टाकी आहेत.

गडावर जाण्याच्या वाटा – पेब आणि नाखिंदच्या मधल्या सोंडेवरून विद्युतमनोऱ्यांजवळून एक वाट पेबवर जाते. या वाटेवरून गेल्यास आधी गुहा लागतात. अथवा, माथेरानचा डोंगर चढून गेल्यावर नगरपालिकेच्या वाहनतळाच्या मागच्या बाजूने एक वाट नेरळ–माथेरान मिनिट्रेनच्या लोहमार्गावर उतरते. त्या मार्गावर NM 158 या milestoneजवळ एक कमान लागते. त्या कमानीमधून एक वाट माथेरानचा पॅनोरमा पॉईंट आणि पेब यांमधील खिंडीतून पेबच्या दिशेने जाते.



# भ्रमंती : पेब किल्ला

लेखक : आनंदयात्री

यावेळी ठरवलेला किल्ला होता – "किल्ले पेब उर्फ विकटगड". पुणे – मुंबई लोहमार्गावर नेरळ स्टेशन आहे. त्याच्या पाठीमागे असणाऱ्या माथेरान या सुप्रसिद्ध थंड हवेच्या ठिकाणाला लागून पेब किल्ला आहे. यावेळी ६ जण नक्की झाल्यामुळे सिंहगड एक्सप्रेसने जाण्याचा बेत रद्द करून आयत्यावेळी गौरवच्या कारमधून सकाळी साडेसहा वाजता निघालो. खोपोलीपर्यंत द्रुतगती मार्गाने जाऊन खोपोलीला कर्जतकडे जाणाऱ्या मार्गाला लागलो. खोपोली–कर्जत १५ किमी, व कर्जतला नाष्टा करून पुढे कर्जत–नेरळ १३ किमी असा प्रवास करून नेरळला पोहोचलो, तेव्हा दहा वाजले होते. पेबच्या किल्ल्यावर जायला दोन मार्ग आहेत. पहिला, नेरळमध्ये कार–पार्किंग ची सोय आहे. तिथे गाडी लावायची व पेबच्या किल्ल्याच्या दिशेने चालत जायचे. ह्या वाटेने साधारण अडीच–तीन तास लागतात. दुसरा मार्ग म्हणजे, सरळ माथेरानचा नगरपालिकेचा वाहनतळ गाठायचा, तिथे गाडी पार्क करायची आणि

डोंगराच्या धारेवरूनच पेब किल्ल्याकडे जायचे. 'पेब किल्ला लवकर पाहून झाला तर थोडा वेळ माथेरानमध्ये भटकता येईल' असा विचार करून आम्ही माथेरानच्या वाहनतळाच्या दिशेने गाडी हाकली.

घाट अत्यंत खड्या चढाचा आहे. त्यातच छोट्या घाटरस्त्यावर नेरळ–माथेरान मार्गावरचे सर्व अधिकृत टॅक्सीचालक सराईतपणे गाडी हाणत असतात. तो घाटरस्ताही enjoy करत आम्ही वाहनतळावर पोहोचलो. Weekend साजरा करायला नवी मुंबई आणि आसपासच्या अलिशान भागातलं सुखवस्तू तारूण्य सहकुटुंब आलं होतं. आमचं ' weekend destination' वेगळं आणि जरा 'हटके' होतं, एवढंच. बाकी सर्वत्र उत्साह दाटला होता.

वाहनतळामधूनच एक पायवाट पॅनोरमा पॉईंटच्या दिशेने जाते. माथेरानकडे जाणाऱ्या त्या निसर्गनिर्मित चालत्याबोलत्या प्रेक्षणीय स्थळांकडे पाठ फिरवून आम्ही या वाटेने चालू लागलो. या वाटेला समांतर असा खालच्या बाजूने नेरळ–माथेरान लोहमार्ग गेला आहे. पेबला जाण्यासाठी हा लोहमार्ग गाठावा लागतो. पण लोहमार्गावर उतरण्यासाठी पायवाट सहजपणे सापडलीच नाही आणि आम्ही थेट पॅनोरमा पॉईंटजवळ जाऊन पोहोचलो. मग वाट चुकल्याचा साक्षात्कार होणे, सराईतपणे धबधब्याची वाट पकडणे इत्यादी नेहमीचे अविभाज्य आणि अटळ सोपस्कार यथासांग पार पाडून कसेतरी लोहमार्गावर NM 169 जवळ उतरलो.

मग त्या रूळांवरून उलट दिशेने नेरळकडे चालू लागलो. साधारण दीड–दोन किमी वर NM 158 हा milestone लागतो. तिथे एका कमानीजवळच्या पाटीवर 'किल्ले पेब उर्फ विकटगड रेल्वे कर्मचारी आपले सहर्ष स्वागत' करतात.

या ठिकाणी रूळ सोडून पेबच्या किल्ल्याच्या दिशेने पायवाट जाते. वाटेत दोन लोखंडी शिड्या, एक गुहेसदृश घळ, आणि बरेच झरे यांना ओलांडून आपण माथेरानचा डोंगर आणि पेब किल्ला यांच्या मधल्या खिंडीत येऊन पोहोचतो. या खिंडीच्या बरोब्बर खूप वर पॅनोरमा पॉईंट आहे. तिथून या खिंडीत उतरायला एकच मार्ग आहे – पाण्यासारखी थेट उडी घेणे. (तात्पर्य, कोणताच मार्ग नाही.)

त्या खिंडीपासून वाट अगदीच सोपी आहे. गडावर पोहोचण्यासाठी आणखी दोन – एकावर एक आणि एकमेकांशी कोनात वळवलेल्या – शिड्या आहेत. गडावर महादेवाचे मंदिर आहे. मंदिराकडे पाठ करून उभे राहिलो की समोर लगेच खोल १००० फूट दरी, दरीपलीकडे उजव्या हाताला माथेरानचा पॅनोरमा पॉईंट, आणि डाव्या हाताला दूरवर नेरळ गाव दिसते. इथून दिसणारे सह्याद्रीचे सरळसोट कडे आपले नजर खिळवून ठेवतात. मंदिराजवळच पिण्याच्या पाण्याचे टाके आणि पाणी काढायला बादली ठेवलेली आहे.

नेरळ गावाकडून येणारी वाट पेबच्या किल्ल्याला ओलांडून मागच्या बाजूने वर येते. त्या वाटेवर दोन गुहा आहेत. या गुहांत अक्कलकोटच्या स्वामी समर्थांचा मठ आहे. विविध उत्सवांच्या निमित्ताने इथे बऱ्याच भक्तांची गर्दी होते, हे तिथल्या

फोटोंवरून कळते. याच गुहांजवळ एक माणूस जाऊ शकेल एवढ्या आकाराचे आणखी एक भगदाड आहे. तिथून आत गेल्यावर एक छोटीशी अंधारी खोलीसदृश जागा आहे. आम्ही सरपटत आत गेलो, आणि अमोनियाच्या उग्र दर्प नाकातोंडात भरून परत आलो. आत फक्त एक वटवाघूळ दिसले. अंधाऱ्या जागेचे प्रयोजन मात्र कळू शकले नाही. या वाटेवर केळीची पाने भरपूर आहेत, आम्ही जेवणासाठी (लगेच) तोडून घेतली.

त्याच वाटेवर पुढे काटकोनात एक लोखंडी शिडी बसवली आहे. नेरळकडून येताना या शिडीवरून चढून येणे हा एकमेव मार्ग आहे. आम्ही माथेरानकडून गेलो असल्यामुळे आम्ही ही शिडी उतरून त्या मठात गेलो.

गडाच्या सर्वोच्च ठिकाणी दोन पादुका व त्याभोवती छोटेखानी फरसबंदी आहे. संपूर्ण गड तासाभरात फिरून होतो. या तासाभराच्या संपूर्ण भटकंतीमध्ये 'भन्नाट रानवारा' आमच्या बरोबर होता. पावसाची आशा शेवटपर्यंत आशाच राहिली. जेव्हा आम्ही पेबवर होतो, तेव्हा माथेरानच्या डोंगरावर ढग सांडत होते, आणि आम्ही माथेरानवर पोहोचलो, तेव्हा पेब पावसात भिजत होता!



परत येताना Casette rewind करावी तसं तोच रस्ता, त्याच शिड्या, तोच NM 169 milestone अशी सारी माघारी पायपीट करून माथेरानच्या वाहनतळावर परत आलो. इथे माथेरानमध्ये जाण्यासाठी तिकीट फाडावे लागते. आणि मुख्य म्हणजे, आत ३०-३५ मिनिटांची पायपीट केल्यावर मुख्य माथेरानची पर्यटनक्षेत्रे लागतात. वेळेअभावी आम्ही माथेरानमधल्या 'सर्व' प्रेक्षणीय स्थळांकडे पाठ फिरवली आणि परतीच्या प्रवासाला लागलो.

गार वाऱ्याची झुळूक यावी आणि क्षणभरात ताजंतवानं वाटावं तसं सह्याद्रीतली ही पेबची पटकन संपून गेलेली भटकंती दीर्घकाळ मनाला ताजं ठेवेल यात शंकाच नाही!

# भ्रमंती : विकटगड ( पेब ) – माथेरान

लेखक : जी एस ( गोविंद सोवळे)

यंदा लवकर आला आला म्हणतांना अजूनही पाऊस हुलकावणीच देत आहे, पण सह्याद्रीत थोडा फार तरी असेल या आशेने रविवारी दिवसभराच्या ट्रेकसाठी शनिवारी १७ जुनला रात्री दहा वाजता कूल, आरती, मिहिर आणि मी असे चौघे पुणे रेल्वे स्थानकावर जमलो. अकराच्या पुणे मुंबई पॅसेंजरने छान झोपून नेरळला पोहोचायचे होते, आणि सकाळी ताजेतवाने होऊन चढाई सुरू करायची होती. पण श्री मर्फी म्हणतात त्याप्रमाणे सहसा एवढे सुरळीत काही होत नसते.

ही पॅसेंजर आता पंढरपूरहून येते असे कळल्यावर जागा मिळणार की नाही असे वाटू लागले, आणि खरच गाडी आत घुसताही येणार नाही एवढे खचाखच भरून आली. मग सव्वाबाराच्या लोकलने थोडीशी झोप घेण्याचा प्रयत्न करत लोणावळ्याला गेलो.तिकडे दोनच्या सुमारास आलेल्या भरगच्च चेन्नई मेलने उभे राहून कर्जतला गेलो. जोरात पाऊस सुरू होता. फलाटावर जागा मिळेल तिथे वर्तमानपत्र पसरून बरीच वेगवेगळी ट्रेकर मंडळी झोपली होती, तर काहींच्या हास्यविनोदाच्या मैफिली रंगल्या होत्या. कर्जतला फलाटावरच थोडा वेळ काढून तीन चाळीसच्या पहिल्या लोकलने पहाटे चार वाजता नेरळला पोहोचलो. फलाटावरच्या बाकड्यांवर डुलक्या घेण्याचा एक अयशस्वी प्रयत्न करून झाला. इथे मला रजनीश गोरे नावाच्या एका ट्रेकरच्या ब्लॉगमधल्या काही ओळी आठवतात.

I have been doing this for a decade, and I have asked myself this question a thousand times before….why? Why do I have to spend a night sleeping on a railway platform, watching the dirty roof, while being devoured by mosquitoes? The answer is simple. It's the mountains. I love them. Is it a reason good enough to explain to the others? Obviously not! It's insanity for most of them. But hey! We need not ever justify our actions when they make us happy…and mountains make me happy…hence the mosquitoes.
Besides this is getting a bit all too familiar. Deserted platforms, the occasional thunder of passing trains, boisterous groups and a silent night. It's one of the typical nights out on the platform before the day begins and we set out to the mountains. So here I am once again at Neral station on this season's first trek to Fort Peb...

अक्षरश : माझ्या मनातलेच लिहिले आहे या माणसाने. तर शेवटी स्थानकाबाहेर पडलो, पाउस थांबला होता पण ढग मात्र गडगडत होते. नेरळ गावातून बाहेर पडण्याच्या मार्गावर एक प्रशस्त मारूती मंदिर सापडले. आत गेलो तर पुजारीबाबा झोपलेले होते आणि डोक्यावर चक्क पंखा चालू होता. अजून काय पाहिजे होते ? लगेच निद्राधीन झालो. पहाटे सहाला उठलो, आणि आवरून लगेच पेबकडे निघालो.



नेरळकडे पाठ करून पश्चिमेकडे तोंड करून उभे राहिले की समोर एक मोठी डोंगररांग दक्षिणोत्तर आडवी पसरलेली दिसते. त्यावर डावीकडे माथेरानचे विस्तीर्ण पहाडावरचे पठार दिसत होते, त्याच्या उजव्या बाजूला, आमच्या बरोबर समोर पेबचा माथा ढगात लपला होता आणि अजून उजवीकडे नाखिंडचे शिखर दिसत होते. पेब आणि नाखिंडच्या मधुन एक सोंड नेरळच्या दिशेने उतरली आहे. त्यावरून मोठे विद्युतमनोरे या सगळ्या आडव्या रांगेच्या पलिकडे गेले आहेत. तीच

दिशा धरून चालायला सुरूवात केली. थोड्याच वेळात पाठीवर सूर्य तापला आणि चढण फारच दमछाक करणारी वाटू लागली. बरेच थांबे घेत खिंडीखालच्या पठारावर पोहोचलो. आता जरा ढग गोळा झाले आणि हवाही सुसह्य झाली. इथे सरळ मनोऱ्याच्या खिंडीकडुन नाखिंडला जाणारी वाट सोडुन, डावीकडे पेबच्या खिंडीत जाणारी वाट घेतली आणि एका ओढ्यातून बरेच चढत अखेर खिंड गाठली.

शेवटच्या दहा मिनिटात ढग दाटून आले आणि पावसाचा सुखद शिडकावाही झाला. पश्चिमेकडुन येणाऱ्या हवेच्या हव्याहव्याशा झुळुकी अंगाला भिडल्या आणि पलिकडच्या विस्तीर्ण भूभागाचा आणि डोंगररांग़ांचा नयनरम्य देखावाही डोळ्यासमोर उलगडला.

आमच्या डावीकडे टेकड्या टेकड्यांच्या टप्प्या टप्प्याने उंच होत गेलेला पेबचा माथा होता, त्यापलिकडे माथेरान उंचावलेले दिसत होते, त्याच्या उजव्या बाजूला विस्तीर्ण प्रबळगड आणि बाजूलाच पदरचा किल्ला. आमच्या मागे आलो तो ओढा थेट नेरळकडे वहात गेला होता. पण तसे सरळ जाता येत नाही कारण वाटेत तो खूपच मोठी उडी घेतो. वायव्येला चंदेरीचा अजस्त्र कातळ – सुळका, त्याच्या बाजूला म्हैसमाळ आणि त्याच्याही पलिकडे श्री मलंगगड. ईशान्येला दूरवर गोरखगड, मच्छिंद्र आणि मग सिद्धगडापासून करजतपर्यंत आलेली सह्याद्रिची एकसंध वाटावी अशी भिंत. या परिसराची सर्व श्रीमंती क्षणात उलगडुन दाखवणारी ही खिंड आहे.

थोडा वेळ थांबून पुन्हा चढाई सुरू केली, मध्ये एक रॉक पॅचही ओलंडला आणि अर्ध्या तासात गडाच्या पोटातल्या गुहांजवळ आलो. प्रत्येक गडावरच्या गुहाही वेगवेगळ्या पद्धतीच्या असतात. नाणेघाटाच्या प्रशस्त गुहेचे तोंड संपूर्ण उघडे आहे, तर काही ठिकाणी दारे, खिडक्या कोरलेली असतात. इथे मात्र अजूनच वैशिष्ट्यपूर्ण होत्या. जेमतेम दीड फुटाच्या चौरस तोंडाचे भुयार, त्यातून सात आठ फूट रांगत आत गेले की मग पायऱ्या वा प्रशस्त गुहा असा प्रकार होता. पाण्याचे टाकेही अशाच रचनेचे होते.

भुकेलेल्यांना थोपवून धरण्यात इथपर्यंत यश मिळाले होते. पण आता साडेअकरा वाजले होते. केळीची पावसाने धुतली गेलेली पाने तोडुन आणली, आणि जेवण सुरू केले. आरतीने चोख भोजनव्यवस्थेत आता प्रावीण्य मिळवले आहे असे मनोमन मान्य करत आधी खूप जास्त वाटलेले अन्नपदार्थ दहा मिनिटात फस्त केले.

गडमाथा अजून दूर होता. त्यामुळे पुढे निघालो. एका अवघड ठिकाणी लोखंडी शिडी उभी करून ठेवली होती, तिचा लाभ घेत वर चढलो, आता अजून बराच वर भगवा ध्वज फडकतांना दिसत होता, मग वाट सोडली आणि सरळ ते टेकाड वर चढु

लागलो आणि थोड्या प्रयत्नाने माथ्यावर दाखल झालो. तिथे कुठल्या तरी स्वामींच्या पादुका आहेत.
माथ्यावर दहा मिनिटे विसावून थोडे पुढे गेलो तर एक आश्रम दिसला, तिथे पुर्वी रहाणाऱ्या एका स्वामींचे शिष्य सध्या मुक्कामाला आहेत. त्यांनी पाणी दिले आणि खाली असलेले शंकराच्या देवळाजवळचे पाण्याचे एक टाकेही दाखवले. कातळाला बिलगून गेलेली माथेरानकडे जायची वाटही दाखवली. पाणी शेंदून बाटल्या भरून घेतल्या आणि माथेरानकडे निघालो तेंव्हा अडीच वाजून गेले होते.




पेबकडुन दक्षिणेकडे जात आम्ही माथेरानकडच्या खिंडीत उतरायला सुरूवात केली. वाटेत एका अवघड कड्यावर वीस वीस फूट उंचीच्या दोन शिड्या एकाखाली एक काटकोनात लावल्या आहेत. तिथुन उतरून माथेरानच्या पहाडावर दाखल झाल्यावर वाट त्या पहाडाला बिलगून दरीच्या काठाने जात रहाते, समोर माथेरानचा सनसेट पॉईंट दिसत होता. हवा अत्यंत अल्हाददायक होती, त्यामुळे भराभर चालत गेलो, एका तासात अजून एक शिडी पार करून घाटातल्या नेरळ माथेरान रेल्वे रूळांवर 155NM दगडापाशी दाखल झालो. वर माथेरान गावात जायचा बेत नव्हताच, मग रेलवे रूळांवरून नेरळच्या दिशेने निघालो. दरीच्या काठा काठाने जाणारा हा मार्ग गेल्या वर्षीच्या पावसाच्या तांडवात अक्षरश : धुवून गेला आहे. जागोजागी उखडलेले रूळ, काही ठिकाणी भूस्खलनामुळे दहा पंधरा फूट जमिनीखाली गाडले गेलेले, तर कधी तुटुन दरीतच अधांतरी लोंबकाळणारे. आणि एक दोन ठिकाणी तर रूळ तसेच पण खालची जमीन आणि स्लीपर्स गायब !! त्यावरून जाण्याची दहा हजाराची पैज लागली पण अखेर सूज्ञपणे माघार घेतली गेली, आणि खाली उतरून पुन्हा वर चढुन

आलो. एकुणच तो हाहाकार बघुन निसर्ग एका क्षणात किती उलथापालथ करू शकतो याची भीतीदायक जाणीव झाली. माथेरानची खासियत असलेली ही पिटुकली रेलवेगाडी पुर्ववत व्हायला अजून किती वर्ष लागणार माहित नाही.

दोन एक किमी चालल्यावर 134NM नेरळ माथेरान रस्ता लागला. आता मात्र आम्हाला पुण्याची गाडी पकडण्याचे वेध लागले होते, त्यामुळे टॅक्सीने नेरळ स्थानक गाठले आणि लगेच योगायोगाने सिग्नल लाल असल्याने मिळालेल्या कन्याकुमारी एक्सप्रेसने सात वाजता पुणे.

पायपिटिचे पूर्ण समाधान देणारा ट्रेक पार पडला. ट्रेक ही चार पाच जणांच्याच गटाने करायची गोष्ट आहे, वीस – तीस जणांच्या झुंडीने नाही या आनंद पाळंदेंच्या विधानाची सार्थकता पुन्हा पुन्हा पटते, तसेच याही वेळी जाणवले. इथे गुहेमध्ये रहायची व पाण्याची उत्तम सोय आहे. इथल्या काही वाटा भर पावसानंतर मात्र चांगल्याच धोकादायक होतील असे वाटते. तेंव्हा काळजी घेणे आवश्यक. फोटो काढायलाच हवा होता असे खूपच क्षण आले या ट्रेकमध्ये पण कोणीच कॅमेरा आणला नव्हता. फोटोग्राफीची मनापासून आवड असलेला कोणीतरी बरोबर पाहिजे त्यासाठी. नाहीतर मला तरी हा छंद जडवून घेतला पाहिजे.

आणि हो, आता पाऊस पाहिजेच !!!!



**कोणत्याही ट्रेकसाठी उपयुक्त टिप्सः**
**(अर्थात knowledge Transfer )**

ट्रेक म्हटलं की उमेदीच्या पहिल्या काही वर्षांतला बराचसा वेळ सॅक भरण्यातच जातो. मला आठवतंय, माझ्या एका मित्राने एका ट्रेकला चक्क बादली आणली होती! खायला, चघळायला काय घ्यावं इथपासून कपडे, शूज कोणते घालावेत, आयत्यावेळेला उपयोगी पडतील अशी साधने कोणती, रानामधल्या वनस्पती–झाडांचे ट्रेकमधले उपयोगी गुणधर्म याबद्दल माहिती देणारा लेख आपण "दुर्ग दुर्गट भारी"मध्ये कायमस्वरूपी प्रकाशित करणार आहोत. पुढच्या वेळी निघताना याची एक प्रिंट घेऊन ठेवा की झालं!

सुरूवात करूया अगदी प्राथमिक टिप्स पासून, लवकरच आपण त्यांची सुधारित आवृत्ती प्रसिद्ध करणार आहोत –

१) ज्या किल्ल्यावर जाणार असाल तिथल्या वाटा, आजूबाजूच्या भूभागाची माहिती, चढायला लागणारा वेळ, राहण्याची सोय याची माहिती गोळा करा आणि घरच्यांनाही देऊन ठेवा. ( 127 hrs आठवतोय ना? ;))

२) प्रमाण नकाशे मिळालेच तर प्रिंट घेऊन जा. वाटा शोधण्यात त्यांचा खूप उपयोग होतो.

३) आपल्याला संपूर्ण वेळ उचलता येईल इतपतच सॅक भरा. आवश्यक त्याच गोष्टी सॅकमध्ये असाव्यात. उदा, ज्या पातेल्यात चहा करायचा त्यातच तांदूळ भिजवता येतील, अथवा एकच ताट झाकण म्हणूनही ठेवता येईल आणि तांदूळ धुवायला सुद्धा वापरता येईल.

४) कुठल्याही ट्रेकमध्ये टॉर्च, काडेपेटी, (मुक्कामी/नाईट ट्रेकमध्ये मेणबत्त्या) चाकू, (स्विस नाईफ असल्यास उत्तम), रद्दी पेपर, दोर, या गोष्टी घ्याच.

५) पायामध्ये ग्रिप असणारे शूज आवश्यक. सर्वात महत्त्वाचे म्हणजे, चढण–उतरण शूजच्या नव्हे तर आपल्या पायांच्या बळावर करणार आहोत हे ध्यानात ठेवावे. त्यामुळे आत्मविश्वासाने पाऊल टाकणेही आवश्यक आहे. पण तरीही, निसरड्या, उभट भूभागावर शूज अतिरिक्त मदत देतात.

६) मुक्कामी ट्रेकमध्ये झोपण्यासाठी कॅरीमॅट उत्तम! वजनाला हलक्या, आटोपशीर असतात.

७) जेवण शिजवून खाण्याची वेळ आल्यास ट्रेकची मजा अजून वाढते. बाहेर पाऊस कोसळतोय, गुहेमध्ये चुलीचा सगळा धूर भरून राहिलाय, अंधारात, टॉर्चच्या प्रकाशात जेवण शिजतंय, त्याचा घमघमाट भूक चाळवतोय, पातेली कुणी घासायची यावर एका बाजूला वाटाघाटी सुरू आहेत.. अर्थात हल्ली रेडी टू कूक ची पॅकेट्स उपलब्ध असतात. नसल्यास पोहे, मॅगी, डाळ/पिठलं-भात. मुगाच्या डाळीची खिचडी हे पदार्थ भूकही भागवतात आणि कमी वेळात तयारही करता येतात. फावल्या वेळात चघळण्यासाठी खजूर, बिस्कीटे, चिक्की सुद्धा घेऊन ठेवा. जांभळे, करवंदांच्या मोसमातला ट्रेक असेल तर मग काय वर्णावी धम्माल महाराजा?

८) प्रत्येकाकडे किमान एक मोठी बाटली पाणी असणे आवश्यक. उन्हाळ्यात २ सुद्धा कधीकधी पुरेनाशा होतात. शिवाय बाटलीचा आपत्कालिन परिस्थितीत 'दाना'साठीही उपयोग होतो तो वेगळाच! :)

९) आपल्या आजारांबद्दल, ऍलर्जीबद्दल प्रत्येकाला माहिती असतेच. त्यानुषंगाने औषधे बरोबर ठेवा. एसटी लागणे, उन्हात फिरल्यास पित्त वाढणे, गवत-झाडीतून फिरल्यास रॅशेस उठणे इ त्रासांना नेहमीच टाळता येणं शक्य नसलं तरी उपाय करता येतात. सर्वासाधारणपणे एक फ़र्स्ट-एड बॉक्स एकाकडे असावा. त्यात ताप-सर्दी-पित्त यावरच्या गोळ्या, भाजल्यास-खरचटल्यास लावायचे मलम, कापूस, बॅंडेज, सोबतीला छोटी कात्री, दोरा, कोरडी फडकी इ साहित्य ठेवावे. ट्रेकमध्ये जबाबदारीने वागल्यास अपघात टाळता येतात हे खरेच. तरीही खबरदारी म्हणून ही औषधे!

१०) सर्वात शेवटी सर्वात महत्त्वाचे, ट्रेकमध्ये निसर्गाला, रानातल्या पशु-पक्ष्यांना, त्यांच्या अधिवासाला धक्का पोहोचेल असे कुठलेही कार्य करू नका. रात्री गोंधळ, गोंगाट, मद्यपान करून धिंगाणा करणे या गोष्टींसाठी ऐतिहासिक किल्ल्यांपेक्षा इतर उत्तम जागा या जगात भरपूर आहेत. दरीतून येणारा वाऱ्याचा आवाज, पक्ष्यांची मंजूळ किलबिल, उन्ह-पावसाचे खेळ, आणि यातलं काहीच नसेल तरी निखळ आणि नितळ शांतता यातलंही सौंदर्य अनुभवण्यासारखं असतं!

तसेच अशा ऐतिहासिक ठिकाणी स्वत:ची नावे लिहून येण्यासारखा नामर्दपणा दुसरा नाही. दस्तुरखुद्द शिवछत्रपतींचे नाव एकाही गडावर त्यांनी लिहिले अथवा लिहून घेतलेले नाहीये ही गोष्ट पुरेशी सूचक नाही का?
ट्रेकींगच्या आनंददायी अनुभवासाठी डोंगरभर शुभेच्छा!

# पेबचा नकाशा


रॉक पॅच
पाण्याचं टाकं
शिडी
सुकलेलं
पाण्याचं टाकं
गुहा
ध्वज
दिवा लावायचे
ठिकाण
आश्रम
ध्वज
माथेरान
बुरूज
शिवमंदिर
पाण्याचं टाकं
दत्तगुरूंच्या पादुका
टॉवर
कुक्कुटपालनकेंद्र
पेब (विकटगड)

# ऋणनिर्देश

१. इतिहासाचा मागोवा: 'रायगडाचे जिल्ह्याचे दुर्गवैभव', लेखक – सचिन विद्याधर जोशी

२. पेब किल्ला (लेख): आनंदयात्री (नचिकेत जोशी)

३. विकटगड (पेब) – माथेरान (लेख): जीएस (गोविंद सोवळे)

४. पेबचा नकाशा: www.trekkshitij.com

५. फोटो :



# आवाहन

दोस्त !

हा नवीन उपक्रम कसा वाटला ते आम्हाला जरूर कळवा. तसेच आपल्या ट्रेकसाठी या महितीचा आपल्याला कसा उपयोग झाला तेही जाणून घ्यायला आम्हाला आवडेल. यात अजून काय आणि कशी सुधारणा करता येईल तेही सांगा. तुम्हाला अशी एखाद्या गडाची ओळख करून द्यायला आवडेल ?

या गडाबद्दल किंवा बृहन्महाराष्ट्रातल्या कोणत्याही गड किल्ल्याबाबत आपणाकडे माहिती फ़ोटो असल्यास कृपया आमच्याशी संपर्क साधा. पुस्तिकांची ही मालिका अधिकाधिक समृद्ध होण्यासाठी आपली मदत हवी आहे. तसेच गडकिल्ल्यांशी संबंधित काम करणारा आपला काही ग्रुप वगैरे असल्यास आम्हाला आपली माहिती कळवा. आपला किंवा आपल्या माहितीतल्या कुणाचा ब्लॉग, वेबसाईट यांचीही लिंक पाठवा. निवडक दर्जेदार लेखन आम्ही आपल्या नावासहित प्रसिद्ध करू.

आज इवलिसी दिसणारी ही पुस्तिका कालांतराने एक संदर्भ ग्रंथ बनावी अशी इच्छा आणि योजना आहे. आणि हे आपल्या मदतीशिवाय अशक्य आहे.

**आपल्या सर्व प्रकारच्या प्रतिसादांसाठी**
**लिहा**

durgabhari@gmail.com

**ई साहित्य प्रतिष्ठानच्या या पुर्वी प्रसिद्ध झालेल्या ई पुस्तकांसाठी**
**भेट द्या**

www.esahity.com

ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान

## आजवरची प्रकाशने

ओथंब,
मोरया,
चार क्षण,
सईची वही
लोकल गोष्टी
प्रियेचे अभंग
तो आणि ती,
टल्लीची शाळा
अहम् ब्रह्मास्मि
ग्रेव्हयार्ड लिटरेचर

मकरंदच्या त्रिवेण्या
मीरा (मराठी अनुवाद)
सावळ्या मुलीची गाणी,
देशी दारूचे दुकान (3D),
मराठी कसे लिहावे(ई शाळा),
तो , मी आणि सिगारेट

**दुर्ग दुर्गट भारी :**
**किल्ले रायगड**

## नियतकालिके

ई साप्ताहिक नेटाक्षरी
स्वरनेटाक्षरी अल्बम्स
ईस्टाप ( मराठी विनोद/ विडंबन)
बालनेटाक्षरी